**किनारपट्टीवरील बंदर प्रकल्पांसाठीच्या रस्ते जोडणी (Road Connectivity) बाबत प्रचलित बंदर विकास धोरणात व बंदर विकासकांशी केलेल्या करारनाम्यांत असलेल्या विशिष्ट तरतूदी तपासून त्यांमधील संदिग्धता दूर करण्यासाठी समितीची स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नाशिका- बैठक ०११५/प्र.क्र.१३/बंदरे-१**
मंत्रालय, मुंबई - ४०००३२,
दिनांक: १३ जानेवारी, २०१५

**शासन निर्णय:**

प्रचलित बंदर विकास धोरणात व बंदर प्रकल्पांसाठी विकासकांशी केलेल्या करारनाम्यांत रस्ते जोडणीसंदर्भात असलेल्या तरतूदीनुसार बंदर विकासकांनी बंदरांकरीता " जोडरस्ते (approach road) " बांधा, वापरा व हस्तांतरीत करा (BOT) या तत्त्वावर स्वतंत्र प्रकल्प म्हणून विकसित करावयाचे आहेत. तथापि " जोडरस्ते (approach road) " च्या व्याख्येबाबत असलेली संदिग्धता, तसेच रस्ते जोडणी, त्यासाठीच्या भूसंपादनावरील खर्च उचलणे व तत्सम बाबींसदर्भात प्रचलित धोरणात असलेल्या तरतूदींचा अभ्यास करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे -

| | | | |
|---|---|---|---|
| १) | अप्पर मुख्य सचिव (बंदरे) | - | अध्यक्ष |
| २) | अप्पर मुख्य सचिव (वित्त) | - | सदस्य |
| ३) | अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग | - | सदस्य |
| ४) | प्रधान सचिव (विधि व न्याय) | - | सदस्य |
| ५) | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड | - | सदस्य सचिव |

२. समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

१) बंदरांसाठी रस्ते जोडणी, त्यासाठीच्या भूसंपादनावरील खर्च उचलणे व तत्सम बाबींसदर्भात प्रचलित धोरणात असलेल्या तरतूदींचा अभ्यास करून धोरणात स्पष्टता आणणे व आवश्यकता भासल्यास धोरणात्मक तरतूदींमध्ये योग्य त्या सुधारणा करणे.

२) बंदर विकासकांशी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने केलेल्या करानाम्यांतील रस्ते जोडणीसंदर्भातील तरतूदीमधील " जोडरस्ते (approach road) " या संज्ञेची स्पष्ट व्याख्या (definition) निश्चीत करणे.

३. या समितीने आपला अहवाल एक महिन्याच्या अवधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११३११३६२६२१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ankush S Gharge

Digitally signed by Ankush S Gharge
DN: CN = Ankush S Gharge, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Joint Secretary
Date: 2015.01.13 12:27:51 +05'30'

**(अं. शा. घार्गे)**
सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव.
अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
प्रधान सचिव (बंदरे), गृह विभाग, जागतिक व्यापार केंद्र, मुंबई -०५.
प्रधान सचिव (विधि व न्याय), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, इंडियन मर्केटाईल चेंबर्स, तिसरा मजला, रामजीभाई कमानी मार्ग, बेलाई इस्टेट, मुंबई-०१.
निवडनस्ती.का-बंदरे-१